**उच्च शिक्षण संचालनालय, पुणे या कार्यालयास उपलब्ध झालेल्या इमारतीचे नुतणीकरण व विद्युतीकरणाच्या कामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. जमिन-२०२३/प्र.क्र.४८/मशि-३,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २६ जून, २०२३.

**संदर्भ:** १) शासन ज्ञापन, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.तंजमि-१७२३/प्र.क्र.६०/२०२३/तांशि-३, दिनांक २१/०३/२०२३.
२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.उशिस/प्रशा-३/कार्यालय जागा/६४९४ व ६६३८ अनुक्रमे दिनांक २४/०५/२०२३ व दिनांक २९/०५/२०२३.

प्रस्तावना-:

संदर्भिय क्र.१) येथील दिनांक २१/०३/२०२३ रोजीच्या शासन ज्ञापनान्वये तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय, पुणे व महाराष्ट्र राज्य तंत्र मंडळ, विभागीय कार्यालय, पुणे या कार्यालयांच्या स्थलांतरणामुळे रिक्त होणारी इमारत उच्च शिक्षण संचालनालय, पुणे या कार्यालयास उपलब्ध करुन देण्यात आली आहे. सदर इमारतीत कार्यालयाचे स्थलांतरण करणेपूर्वी अधिकारी/कर्मचारी बैठक व्यवस्था,अभिलेख कक्ष निर्मिती, विद्युतीकरण, इंटरनेट लॅन केबल, इमारतीचे अंतर्गत व बाहेरील रंगकाम तसेच किरकोळ डागडूजी आदी कामे करणे आवश्यक आहे. याकरीता संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांनी संदर्भिय क्र.२) येथील दिनांक २४/०५/२०२३ व दिनांक २९/०५/२०२३ रोजीच्या पत्रान्वये कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम इमारती विभाग, पुणे याजकडून इमारतीचे नुतनीकरण व विद्युतीकरणाच्या कामकाजाचे अंदाजपत्रके तयार करुन प्रशासकीय मान्यतेसाठी प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला आहे. सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-:

संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांनी कार्यालयास उपलब्ध झालेल्या इमारतीचे नुतनीकरण व विद्युतीकरणाच्या कामांसाठी रु.२,१०,४४,७३९/- (स्थापत्य व फर्निचरची कामे रु.१,५६,८२,१८३/- + विद्युत कामे रु.५३,६२,५५६/-) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत प्रस्ताव सादर केला आहे. सदर कामाच्या अंदाजपत्रकास मुख्य अभियंता (स्थापत्य/विद्युत), सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांनी तांत्रिक सहमती दिलेली आहे. या अनुषंगाने उच्च शिक्षण संचालनालय, पुणे या कार्यालयास उपलब्ध झालेल्या इमारतीचे नुतणीकरण व विद्युतीकरणाच्या पुढील कामांसाठी रु.२,१०,४४,७३९/- (रुपये दोन कोटी दहा लक्ष चव्वेचाळीस हजार सातशे एकोणचाळीस फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**स्थापत्य व फर्निचरची कामे :-**

| अ. क्र. | कामाचे नाव | अंदाजित रक्कम (रु.) |
|---|---|---|
| अ) | स्थापत्य कामे- तळमजला | |
| १. | महिला व पुरुष स्वच्छता गृहाची टाईल्स व अंतर्गत रंगकाम करणे | ९,५१,८२२.०० |
| २. | महिला व पुरुष स्वच्छता गृहाची सॅनीटरी फिटींग, फरशीचे पॉलीस, उर्वरित अंतर्गत रंगकाम करणे. | ९,९३,९९९.०० |
| ३. | संचालक व मिटींग हॉलची सिलिंग व फरशी, टाईल्स व अंतर्गत रंगकाम करणे. | ९,७१,३५१.०० |
| | पहिला मजला | |

| | | |
|---|---|---|
| ४. | महिला व पुरुष स्वच्छता गृहाची सॅनीटरी फिटींग, टाईल्स व अंतर्गत रंगकाम करणे. | ९,९७,८४८.०० |
| ५. | सहसंचालक दालनाचे सिलिंग व इतर कार्यालयाचे रंगकाम करणे. | ८,३८,९४२.०० |
| ६. | पहिला व दुसरा मजल्याचे बाहेरील रंगकाम करणे | ९,८१,२०१.०० |
| ब) | फर्नीचरची कामे | |
| ७. | संचालक दालन नुतनीकरण करणे | ९,९९,५६२.०० |
| ८. | सहसंचालक दालन नुतनीकरण करणे. | ९,८५,२९३.०० |
| ९. | अधिकारी दालनाचे नुतनीकरण करणे. | ९,९९,१४३.०० |
| १०. | वरिष्ठ प्रशासन अधिकारी व कर्मचारी कक्षाचे नुतनीकरण करणे. | ९,९९,८५३.०० |
| ११. | कर्मचारी कक्ष (१२) चे नुतनीकरण करणे. भाग-१ | ९,७४,०८०.०० |
| १२. | कर्मचारी कक्ष (१२) चे नुतनीकरण करणे. भाग-२ | ९,९८,८५३.०० |
| १३. | कर्मचारी कक्ष (८) चे नुतनीकरण करणे | ९,९५,२१८.०० |
| १४. | कर्मचारी टेबल व साइड रनरचे काम करणे | ९,९८,२००.०० |
| १५. | अभिलेख शाखेचे नुतनीकरण करणे. | ९,९८,१३७.०० |
| १६. | कार्यालयाचे दरवाजे नुतनीकरण करणे. | ९,९८,६८१.०० |
| | **एकूण** | **१,५६,८२,१८३.००** |

**विद्युत कामे :-**

| Sr. No. | Est. No. & Name of Work | Amount in Rs. |
|---|---|---|
| 1. | Est. No. 115518 of 2023-2024:- Providing E.I. in the Directorate Higher Education Ground floor office Model Colony at Pune. | 8,00,636.00 |
| 2. | Est. No. 115519 of 2023-2024:- Providing E.I. in the Directorate Higher Education first floor office Model Colony at Pune. | 7,99,897.00 |
| 3. | Est. No. 115520 of 2023-2024:- Providing UPS in the Directorate Higher Education Ground floor office Model Colony at Pune. | 5,48,820.00 |
| 4. | Est. No. 115521 of 2023-2024:- Providing UPS in the Directorate Higher Education first floor office Model Colony at Pune. | 5,48,820.00 |
| 5. | Est. No. 115522 of 2023-2024:- Providing Air Conditioning units in the Directorate Higher Education office Model Colony at Pune. | 7,99,995.00 |
| 6. | Est. No. 115523 of 2023-2024:- Providing Inverters in the Directorate Higher Education office (Gr. floor & first floor) Model Colony at Pune. | 2,84,236.00 |
| 7. | Est. No. 115524 of 2023-2024:- Providing LAN & telephone system in the Directorate Higher Education office Ground floor Model Colony at Pune. | 7,85,527.00 |
| 8. | Est. No. 115525 of 2023-2024:- Providing LAN & telephone system in the Directorate Higher Education office first floor Model Colony at Pune. | 7,94,625.00 |
| | **Total Amount of Rs.:-** | **53,62,556.00** |

**२. उपरोक्त मान्यता पुढील अटींच्या अधीन राहून प्रदान करण्यात येत आहे :-**

१. स्थापत्य कामाच्या पूर्ततेच्या कालावधीतच ढोबळ स्वरुपात गृहीत धरण्यात आलेल्या अनुषंगिक तरतूदींबाबत योग्य नियोजन करुन सविस्तर अंदाजपत्रकानुसारच पुढील कार्यवाही करुन काम हाती घ्यावे .

२. काम सुरु करण्यापूर्वी सदर अंदाजपत्रक सार्वजनिक बांधकाम विभागाचे संबंधित अधिक्षक अभियंता व मुख्य अभियंता तसेच उपभोक्ता खात्याचे सक्षम अधिकारी यांच्याकडून साक्षांकित करण्यात यावे.

३. सदर कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यता लागणार नाही, याद्दष्टीने विशेष दक्षता घेण्यात यावी.

४. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय,क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क्र.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

५. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रमांक बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दिनांक ०७.०७.२०१७ नुसार प्रस्तुत कामाशी संबंधीत मुद्यांची कार्यवाही करावी.

६. प्रस्तुत कामासाठी अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय नुतनीकरणाचे काम हाती घेण्यात येऊ नये.

३. या कामासाठी होणारा खर्च मागणी क्र.एच-८, ४२०२ शिक्षण, क्रीडा, कला व संस्कृती यांवरील भांडवली खर्च, ०१ सर्वसाधारण शिक्षण, २०३ विद्यापीठीय व उच्च शिक्षण, (००) (०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम) (४२०२ ००७९), ५३ मोठी बांधकामे या लेखाशिर्षाखाली प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे उपलब्ध होणाऱ्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. हे आदेश शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दिनांक २०/०९/२०१९ चे वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग-पाच महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील अ.क्र.३, परिच्छेद क्रमांक १३४(३) नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२३०६२६१३४९०४६९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

HEMANTKUMAR
PANDHARINATH
BAVISKAR

Digitally signed by HEMANTKUMAR PANDHARINATH BAVISKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=71de9bdf8c28541d92a5cd36d722315bab7f006ec5420633722d42e0976d82a8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=284A4236AE7795D36DD2ECB5AC6CA70C333A3CF1B13F66828D224AE2026B37E9, cn=HEMANTKUMAR PANDHARINATH BAVISKAR
Date: 2023.06.26 13:50:52 +05'30'

**( हे. पं. बाविस्कर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.

७. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
९. वित्त विभाग, व्यय-५, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. नियोजन विभाग, कार्यासन-१४७१, मंत्रालय, मुंबई-३२
११. सार्वजनिक बांधकाम विभाग, कार्यासन-इमा-३, मंत्रालय,मुंबई-३२.
१२. अवर सचिव (साशि-१/मशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. निवड नस्ती (मशि-३), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.